भोगिल्या स्थिति । अझुनि निश्चिती । सद्गुरुमुखें वळख गोपती ॥ १ ॥
अंतरस्थिति । लावीं हे रती । ठेवुनी प्रीति । पाहें प्रतिती ।
उन्मति गति । सुखसंभूती । अवस्थास्थिति । मावळे वृत्ति ॥ २ ॥
दुर्मदा मदा । नातळें कदा । सद्गुरुपदा । सेवि सर्वदा ।
चुकति आपदा । सुखसंपदा । त्यजुनि सर्वदा । पावती पदा ॥ ३ ॥
सद्गुरुमुखें । वस्तु ओळखें । आपुल्या सुखें । राहें कौतुकें ।
हरति पातकें । भंगती दुःखें । नाठवे तदा पारखें सखें ॥ ४ ॥
तेव्हां शोक मावळे । द्वेष तो पळे । कामना गळे । कल्पना जळे ।
ब्रह्म आकळे । अनुभवें कळे । मोक्ष तेधवां तुजला फळे ॥ ५ ॥
देखणें सरे । देखतें विरे । दर्शनें मुरे । शब्द ओसरे ।
स्फुरणही जिरे । वृत्तिही विरे । वृत्तिवीण तो मुक्त वावरे ॥ ६ ॥
ध्यान तें बुडे । ज्ञान तें उडे । भेद वीघडे । अभेद ना घडे ।
मोक्ष तो खुडे । सुख वो! झडे । केशवीं स्थिति माविल्या कडे ॥ ७ ॥

**पद ७३३ वें.**

सांग पां माझें उपाणें रे! ।
नकळे तरी तूं संतांसीं पुसें गुरुविणें खुण न वाणे रे! ॥ ध्रुवपद. ॥
एकवीस स्वर्गावरी उडे एक घारी पाताळा खालें तिची छाया रे! ।
चळेना ढळेना त्रिभुवनिं खेळे मन भुली आली ते ठाया रे! ॥ सांग० ॥ १ ॥
गंगातीरीं एक सोवळा ब्राह्मण अनामिका[1] घरीं राहे रे! ।
याति ना कूळ परी शिखा[2] सूत्र[3] वागवी एकही वर्ण[4] न साहे रे! ॥ सांग०॥२॥
वाघाच्या वाडां एक मिस्किन गाय ते ढवळ्या बैलाची माय रे! ।
दांतेंविणें तिनें वाघासि गिळिलें तिचा पाडा तिसीं खाय रे! ॥ सांग० ॥ ३ ॥
सूर्याचे गांवीं गँडद[6] धुंग पडिलें अंधळ्यानें लाविली वाँती[7] रे! ।
काजळें डोळा धुवुनी सांडितां नुरेचि दिन ना राती रे! ॥ सांग० ॥ ४ ॥
मायेचा [8]घो हो! गाभणा झाला तो बाइलेस आपण व्याला रे! ।
गुरुकृपें केशवीं नेवलार[9] पाहतां चांदणीनें डोहो गिळियेलां रे! सांग० ॥ ५ ॥

**पद ७३४ वें.**

तयाचें नांव तें काय रे! ।
चतुर होसी तरी सांगोनि देसी नाहीं तरी उगलाची राहें रे! ॥

१. आपपर कांहींच आठवत नाहीं. २. अंत्यजाच्या घरीं. ३. शेंडी. ४. यज्ञोपवीत. ५. चार वर्णांपैकीं कोणताही. ६. काळोख पडला. ७. 'ज्योति' असा अन्य पाठ. ८. नवरा. ९. नवल. १०. हें कूट पद आहे.

[illegible] घर तया आंत शिखर तयांत एक मंदिर रे!।
[illegible] एक पुरुष आदि [illegible] सुंदर रे! ॥ तयाचें० ॥ १ ॥
[illegible] एक [illegible] पडिली तयांत एक बाहुली रे!।
आपण [illegible] उदरा [illegible] पाहतां ते तेणेंचि केली रे! ॥ तयाचें० ॥ २ ॥
तेणें केली हेही बाहुगिच बोली नाहीं ते तेणें देखिली रे!।
तया दोघांमध्यें संबंध नसतां त्याचीच बाइल झाली रे! ॥ तयाचें० ॥ ३ ॥
नव्हे तो शिव नव्हे तो शक्ति नचले वाचा युक्ती रे!।
गुरुकृपें केशवीं इतरांसी कोडें अनुभवी खूण जाणती रे! ॥ तयाचें० ॥ ४ ॥

### पद ७३५ वें.

सांगतां दिसे बहु कोडें रे!। कळेना तें जाहलें वेडें रे!।
अनुभवी खूण जाणती तेथिची इतरांसि कां न कोडें रे! ॥ ध्रुवपद. ॥
मेरूचे शिखरीं उभि एक नारी पती तिचा ब्रह्मचारी रे!।
त्याचिया संगें ते प्रजांसि व्याली परि ते कर्णकुमारी रे! ॥ सांगतां० ॥ १ ॥
शून्याचे शेंडा एक तरुवर देखिला तयासी मूळ ना डाहाळ रे!।
शाखा पुष्प त्यासी नसोनि कांहीं सर्वांगें निज सफळ रे! ॥ सांगतां० ॥ २ ॥
चांदाचें दोंदावरी चांदणें पडिलें अवसेची झाली पुनाव रे!।
सतेज तेजें ढवळा उजळुनी अवघिच उखा केली रे! ॥ सांगतां० ॥ ३ ॥
वोस नगरीं राहणें दिवसा पडिलें चोरें चोरा नागविलें रे!।
संन्याशाचा कर्मबंध तुटला माशानें तरळा नेलें रे! ॥ सांगतां० ॥ ४ ॥
तीं खणावरी देउळ रचिलें देवासि ठावचि नाहिंच रे!।
गुरुकृपें केशवीं दर्शन घेतां देउळ उडालें पाहीं रे! ॥ सांगतां० ॥ ५ ॥

### पद ७३६ वें.

येवढें कोडें उगविसी तरि तुज देइन हें मन घोडें रे! ॥ ध्रुवपद. ॥
काय तें सांग मज पुढें रे! खेळया! सूर्याहुनि तेज गाढें रे!।
अमृताहुनि गोड गगनाहुनि वाढ कांहींच नसे त्याच्या पाड रे! ॥ १ ॥
पूर्वीं तेंचि आतांही तेंची अंतींही तेंचि एक रे!।
कांहींच संग न करितां तें नाचवितें तिन्ही लोक रे! ॥ येवढें० ॥ २ ॥
प्रकृति नव्हे पुरुष नव्हे तें नपुंसक नव्हे पाहीं रे!।
गांव ना शींवें, रूप ना नांव, परि तें सकळा ठायीं रे! ॥ येवढें० ॥ ३ ॥

---

१. हें पद कूट आहे. २. उंच. ३. स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ हे तीन लोक. ४. सीमा, मर्यादा.

गोरें हिरवें काळें पिवळें नसे तेथें एकहि रंग कांहीं रे! ।
सद्गुरुकृपेंविण तें कदापि न दिसे एकपणेंविण पाहीं रे! ॥ येवढें० ॥ ४ ॥
आदी मध्य अंत ज्याचा ब्रह्मादिकांसि नाहीं जें अति गूढ रे! ।
गुरुकृपें केशवीं सबाह्य लक्षितां पदोपदीं पुरतसे कोडें रे! ॥ येवढें० ॥५॥

### पद ७३७ वें.

तयासि दिसे जें तव नाहीं । म्हणउनि उगला राहीं ॥ ध्रुवपद. ॥
समाधि व्युत्थानीं सम होणें । ऐसें ज्याचें देणें ॥ तयासि० ॥ १ ॥
अखंड ठेवुनियां सुख धामीं । सबाह्य निववी स्वामी ॥ तयासि० ॥ २ ॥
सर्वही हारपलें जे ठायीं । त्या पदीं नांदवी पाहीं ॥ तयासि० ॥ ३ ॥
पुष्कळ देउनियां निजबोधा । करणें केलीं [2]मोघा ॥ तयासि० ॥ ४ ॥
मीपण निर्द्वंद्व········ । केशव म्हणे मम ताता ॥ तयासि० ॥ ५ ॥

### पद ७३८ वें.

चिन्मय मोतीं गे! बाई! । माझें न दिसे करुं काई? ।
सहसा न पडेचि ठायीं लागो कवणाचे पायीं ॥ ध्रुवपद. ॥
नाना साधनें तो केर । सखियें! पाखडिला फार ।
सकळ मडकीं धुंडियलीं राजस तामस प्रकार ॥ चिन्मय० ॥ १ ॥
ग्रंथीं गांठोडीं सकळीं । दिवसरजनीं शोधियलीं ।
बहु दैवत देव्हारे फिरतां काया हे श्रमली ॥ चिन्मय० ॥ २ ॥
सखिये [3]नवलाव झाला । सद्गुरुराज भेटला ।
निजात्मबोध [4]दर्पण तो तेणें मजला दाखविला ॥ चिन्मय० ॥ ३ ॥
संशय पदर काढितां कंठींचें मोतीं झळझळी ।
केशवस्वामी सद्गुरुकृपें आत्मप्राप्ति पैं झाली ॥ चिन्मय० ॥ ४ ॥

### पद ७३९ वें.

पाहतां गोपाळराया आनंदें [5]धाली ।
सहजीं सहज [6]तन्मय होउनी ठेली ॥ ध्रुवपद. ॥
झोंपेली कोमेली अवघी सावध झाली ।
त्रैलोक्याचा स्वामी तेथें विश्रांति आली ॥ पाहतां० ॥ १ ॥
प्रेमें निवाळी सुखस्वरुप जाली ।
स्वानंदें मग्न कैसी [7]जीतें ना मेली ॥ पाहतां० ॥ २ ॥

---

१. कौतुक. २. व्यर्थ. ३. नवल, आश्चर्य. ४. आरसा. ५. तृप्त झाली. ६. तदाकार. ७. जीवंत, सजीव.

गुरुकृपें केशवराजीं पहातां पाहे ।
निवालें मानस तरी धणी[1] न धाई ॥ पाहतां० ॥ ३ ॥

### पद ७४० वें.

गडबड गुंडा सद्गुरुचरणीं ।
मानस माझें जाहलेंसे लंडा ॥ ध्रुवपद. ॥
जप तप साधन हें तों आतां अवणिया कामा ।
सद्गुरूचे पाय हेंची वैकुंठ आम्हां ॥ गड० ॥ १ ॥
भावें लोळेन चरणीं माती लावीन कपाळीं ।
सद्गुरूचे पायीं आम्हां नित्य दिवाळी ॥ गड० ॥ २ ॥
वादक वाद याचा आतां उबग[2] आला ।
केशव सद्गुरुचरणीं निश्चळ झाला वो! झाला ॥ गड० ॥ ३ ॥

### पद ७४१ वें.

नारायणा[3] स्मरतां नाहीं यातना[4] ।
अहर्निशिं[5] आठवीं मधुसूदना[6] ।
अच्युताचें[7] चिंतन करीं रे! मना! ।
निजभावें वोळगें[8] कमळनयना ॥ ध्रुवपद. ॥
गोविंदाचें ध्यान तूं अखंड करीं ।
माधवासी मानसीं दृढ धरीं ।
अनंताचें स्वरूप पाहें सबाह्यांतरीं ।
वासुदेवीं राहें तूं निरंतरीं ॥ नारायणा० ॥ १ ॥
हृषीकेश हृदयीं तूं आकळीं सदां ।

---

१. तृप्ती. २. त्रास. ३. नारायण या नांवाच्या उत्पत्तीविषयीं पुढील श्लोक अवलोकनीय आहेत:—'नराज्जातानि तत्त्वानि नराणीति विदुर्बुधाः । तस्य तान्ययनं पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥ १ ॥ आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः । अयनं तस्य ताः पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥ २ ॥' अर्थ:—पंडित लोक नारापासून उत्पन्न झालेल्या तत्वांना 'नर' असें समजतात. तीं नारें (तत्वें) पूर्वीं परमेश्वराचीं अयनें (आश्रमस्थानें) झालीं होतीं म्हणून त्याला 'नारायण' असें नांव पडलें. ॥ १ ॥ उदक नरापासून उत्पन्न झालें म्हणून त्याला 'नर' असें म्हणतात. तें 'नर' (उदक) पूर्वीं ईश्वराचें अयन (वसतिस्थान) होतें म्हणून परमेश्वराला 'नारायण' असें नांव पडलें. ॥ २ ॥ ४. त्रास. ५. रात्रदिवस. ६. 'जेणें कर्णमलोद्भव मधुनामा दैत्य मारिला चक्रें । यास्तव 'मधुसूदन' हें नाम तया ठेविलें समुनि शक्रें ॥ ७३ ॥' [नामार्थदीपिका—पृष्ठ ९.] ७. पद ६७२ वरील टीप पहा. ८. प्रीति कर.

दामोदरीं आवडी ठेवुनी सर्वदां ।
गोपाळासी ध्यातां मग नाहीं आपदा ।
परमानंदीं लीन होतां पावसी [1]पदा ॥ नारायणा० ॥ २ ॥
अनन्य भावें [2]भगवंतीं शरण रि[3]घावें ।
सकळ [4]जनार्दनीं दर्शन घ्यावें ।
गुरुकृपें केशवराजीं तन्मय व्हावें ।
निर्गुण स्वरुपीं मिळोनी जावें. ॥ नारायणा० ॥ ३ ॥

### पद ७४२ वें.

आनंद मोठा हो ब्रह्मानंद मोठा वो! ।
त्रैलोक्यविश्रामधाम आला पोटा वो! ॥ ध्रुवपद. ॥
सर्वांगदे[5]खणा राम देखिला जेव्हां ।
जन्म मरण दुःख कांहीं नाठवे तेव्हां ॥ आनंद० ॥ १ ॥
दृश्य भाग ज्यासी कांहीं ठाउका नाहीं ।
सर्वकाळ आम्हीं त्यासी आलिंगिलें पाहीं ॥ आनंद० ॥ २ ॥
गुणावगुणातीत सदोदित देवराणा ।
केशव म्हणे गुरुकृपें सांपडला जाणा ॥ आनंद० ॥ ३ ॥

### पद ७४३ वें.

भज रे! सखया! रघुराया! ।
चरणकमलदल लक्षुनि अंतरीं भजन करीं हरिं झडकरी काया ॥ ध्रुवपद. ॥
प्रल्हाद उद्धव वाल्मिकादि सर्व अगर्व होउनीयां गुण गाती ।
नारद तुंबर [6]सुरवर किन्नर गाती निरंतर अंतरीं ध्याती ॥ भज० ॥ १ ॥
[7]सहस्रवदन करी स्तुति निरंतरी स्तवनपरायण निगमही झाला ।
व्यास विश्वामित्र शुक सनकादिक स्तवन करिती, जिवीं धरिती जयाला ॥

---

१. मोक्षपदा. २. 'भगवान्' शब्दाची व्याख्या आढळते तीः—'उत्पत्तिं प्रलयं चैव भूताना-मगतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥' (म्हणजे, सर्व स्थावरजंगमात्मक जगाचा उद्भव आणि नाश हे कसे होतात, जग आलें कोठून, जाणार कोठें, विद्या आणि अविद्या काय आहेत, हें सर्व जो जाणतो त्याला भगवान् म्हणावें) किंवा सकल ऐश्वर्य, धर्म अथवा वीर्य, कीर्ति, द्रव्य, ज्ञान, वैराग्य हीं सहा भगें ज्यास आहेत तो भगवान्. ३. जावें. ४. दुष्टाचें अर्दन (नाश) करितो तो जनार्दन. ५. सुंदर. ६. देवश्रेष्ठ. ७. शेष.

[1]अंतीं [2]गतीदायक निजपदनायक रामरमापती [3]गोपती राजा ।
केशव म्हणे चित्सागर नागर प्राणसखा हरि केवळ माझा ॥ भज० ॥ ३ ॥

### पद ७४४ वें.

ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण मुख्य ध्यातां । चारी मुक्ति वंदिती पाय माथां ॥ ध्रुवपद.॥
ब्रह्मनिष्ठ ते ब्राह्मण मुख्य पाहीं । यातीकूल प्रमाण त्यांसी नाहीं ॥ ब्रह्म० ॥१॥
ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण तेंची ब्रह्म । ब्रह्मनिष्ठाभजन हाची धर्म ॥ ब्रह्म० ॥ २ ॥
ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण येती घरा । तैं [4]उरी नुरे या संसारा ॥ ब्रह्म० ॥ ३ ॥
ब्रह्मनिष्ठ भजतां निजभावें । ब्रह्म केशवीं पडिलें पूर्ण ठावें ॥ ब्रह्म० ॥ ४ ॥

### पद ७४५ वें.

आणिक मानेना मजला आणिक मानेना ।
रामरमापतिवीण मति माझी [5]भंवरति जाणेना ॥ ध्रुवपद. ॥
त्रिभुवनजनकाचे मानसीं चिंतितां पद साचे ।
मीपण माझें विरुनी वेगीं भोगीन सुख साचें ॥ आणिक० ॥ १ ॥
सकळही शृंगार मजला वाटती बहु भार ।
प्राणसखा हरी झडकरी कैं तो भेटेल साचार ॥ आणिक० ॥ २ ॥
केशवस्वामी वो! सबाह्य अंतर्यामीं वो! ।
तत्पदीं तन्मय होउनी राहीन मंगळधामीं वो! ॥ आणिक० ॥ ३ ॥

### पद ७४६ वें.

किति तरी शिकवावें तूजला आम्हीं रे! ।
[6]श्रमहरण [7]न्याहाळीं डोळां स्वामी रे! ॥ ध्रुवपद. ॥
कां वा! व्यर्थची भुलसी माया कामीं रे! ।
कां बा! गुंतुनी पडशी अवगुणग्रामीं रे! ॥ किति० ॥ १ ॥
किती [8]नाथिला करिसी व्यर्थ धंदा रे! ।
किती विषयीं लोळसी बुद्धिमंदा रे! ॥ किति० ॥ २ ॥

---

१. 'अती' असा अन्य पाठ. २. मोक्ष देणारा. ३. 'गाईंस गोपवेषें पतिरूपें वा महीस पाळितसे । यास्तव कविजन म्हणती 'गोपति' हें नाम त्यास योग्य दिसे. ॥ ९५ ॥ [पृष्ठ ५६] गोशब्दें भूम्यादिक त्या सर्वांचाहि जो पती झाला । यास्तव कवि म्हणति जनीं 'गोपति' हें नाम जाहलें त्याला. ॥ ९२ ॥ (नामार्थदीपिका पृ० ६६.) ४. कमीपणा, वाण.. ५. संसाराची गोडी. ६. श्रम हरण करणारा. ७. पहा. ८. चांगला नव्हे तो, वाईट.

केशवप्रभु पाहें तूं आजी डोळां रे! ।
करि कायेची कुरवंडी वेळोवेळां रे! ॥ किति० ॥ ३ ॥

पद ७४७ वें.

तें सिद्धचि नकळे कैसें पाहीं । तूंची परी न पडे तुज ठायीं ।
म्हणुनियां सद्गुरुशीं शरण जाई । पडों नको तूं मायाप्रवाहीं ॥ ध्रुवपद. ॥
दृष्टी जेणें सकळ देखत आहे । शब्द श्रवणें ऐकसी जेणें पाहे ।
घ्राणें गंध रसनेसी स्वाद लाहे । जड देह हें जेणें चळताहे ॥ तें सिद्ध० ॥१॥
वायां आपणा म्हणविसी देह देह । पहातां तुज तो न दिसे देहिं देह ।
देहीं देंह असूनी विदेह । तूंचि नाथिला कां कैंचा संदेह ॥ तें सिद्ध० ॥ २ ॥
वर्णाश्रम साधन धर्म नेम । सांडी लय लैंक्षमुद्रा हा तो भ्रम ।
गुरुकृपें केशवीं पूर्ण गुरुगम्य । पाहतां सिद्धचि तूं परब्रह्म ॥ तें सिद्ध० ॥३॥

पद ७४८ वें.

खटाटोप करणें कासया । भावें वोळंगें श्रीगुरुसखया ॥ ध्रुवपद. ॥
संतसेवा हेंची पैं साधन । आसन मुद्रा हेंचि पैं बंधन ॥ खटाटोप० ॥ १ ॥
त्यजुनी भ्रांती हे वावुगी । स्थीर राहें सर्वदा सत्संगीं ॥ खटाटोप० ॥ २ ॥
केशव म्हणे सद्गुरुभजनीं । जनार्दन दिसतो या जनीं वनीं ॥ खटाटोप० ॥३॥

पद ७४९ वें.

मायेनें कैसें भुरळें घातलें । कांहीं हित नेणती आपुलें ॥ ध्रुवपद. ॥
धनवंतापुढें पैं धांवती । पोटालागीं नीचांसि वंदिती ।
परी आत्मसुटका नेणती । वायांची भवसागरीं बुडती ॥ मायेनें० ॥ १ ॥
कोणें काय प्रपंचीं साधीलें । फुकट वय विषयीं वेंचिलें ।
नाहीं आपअपणा ओळखीलें । देखत कैसें भ्रांतीनें ठैंकिलें ॥ मायेनें० ॥२॥
त्यजुनी माया ममत्व संबंधू । निजरूपीं वाहिलेत साधू ।
तेची वेगीं तरले भवसिंधु । गुरुकृपें केशवीं आनंदू ॥ मायेनें० ॥ ३ ॥

---

१. केशव+प्रभु=केशवाचा स्वामी (देव). २. कुरवंडी करणें—ओंवाळून टाकणें. ३. मौनव्रत, अबोला. [यच्छति वाचि मुद्राम्—वाचि मौनं ददाति—असा 'मुद्रा' शब्दाचा मौनार्थक प्रयोग संस्कृत काव्यांतही आढळतो. [स्तुतिकुसुमांजलि—स्तोत्र ११ श्लोक ७६.] ४. भक्तीनें. ५. व्यर्थ. ६. घालविलें. ७. फसविलें.

### पद ७५० वें.

सद्गुरुकृपा ऐशी । प्रत्यक्ष फळली[1] कैसी ।
आम्हीपण आम्हांशीं उरलें ॥ ध्रुवपद. ॥
स्तवन करितां मुखें । वेद झाले मुके ।
ऐसीया भूमीके । आम्ही आरूढ झालों ॥ सद्गुरु० ॥ १ ॥
आमुचें स्वरुप माय । सांगिजेसें आहे काय ।
कांहीं नाहीं तेंची स्वयें । होउनी असों ॥ सद्गुरु० ॥ २ ॥
निजबोधें[2] अवलिळा । सर्वांग जाहला डोळा ।
केशवीं देखणी कळा । दुजेंनिविण ॥ सद्गुरु० ॥ ३ ॥

### पद ७५१ वें.

सांगतां नवलपरी । मीपणा नाहीं उरी ।
तूंपणाची सरोबरी । आमुच्या गांवीं ॥ ध्रुवपद. ॥
आमुचें पाहतां मूळ । हरपलें यातीकूळ ।
सूक्ष्म ना स्थूल । असों ऐसें आम्ही ॥ सांगतां नवल० ॥ १ ॥
पहाणेंवीण तें पाहों । अविलंबेंविण राहों ।
जैसे आहों तैसे आहों । सहज आम्ही ॥ सांगतां नवल० ॥ २ ॥
आम्ही अम्हीपणें वसों । असतेपणेंची नसों ।
कांहीं न होउनियां असों । केशव म्हणे ॥ सांगतां नवल० ॥ ३ ॥

### पद ७५२ वें.

जोगवा वो! अंबे! जोगवा वो! ।
औठपिठ[3] नायके परी । पूर्ण द्यावा वो! ॥ ध्रुवपद. ॥
भक्ति परडी घेउनी हातीं रंगणासी आलें ।
निज जोगवा घालीं अंबे! दासी तूझी झालें ॥ जोगवा० ॥ १ ॥
शुद्ध सत्व दर्शनें त्यालें तुझे लागीं ।
केवळ भूतीं झालें लावुनी संसारासी आगी ॥ जोगवा० ॥ २ ॥
दीन वाणी ऐकुनी कानीं अंबा प्रसन्न झाली ।
निजभाव पूर्ण जोगवा केशवस्वामीस घाली ॥ जोगवा० ॥ ३ ॥

### पद ७५३ वें.

सखे! सोयरा वैकुंठराणा वो! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. फळ देती झाली. २. लीलेनें, सहज. ३. ह्या तीन पीठांचीं नांवें पद १३१ मध्यें पहा.

निजसुखदायी फणिवरशायी[1] । यादव भाई! आणा वो! ॥ सखे!० ॥ १ ॥
क्षीराब्धिवासी भक्तविलासी । आनंदराशी आणा वो! ॥ सखे!० ॥ २ ॥
गोपीमनोहर देव सर्वेश्वर । गोविंद यदुविर आणा वो! ॥ सखे!० ॥ ३ ॥
केशवस्वामी रमणीय नामीं । अंतर्यामीं आणा वो! ॥ सखे!० ॥ ४ ॥

### पद ७५४ वें.

पाहाणें न पाहाणें । राहिलें पाहाणें ।
डोळियांसि देखणें डोळ्यांनीं केवीं? ।
पाहाणें न पाहाणें । नुरे आत्मदर्शनें ।
यालागीं बोलणें 'नेती नेती'[2] ॥ ध्रुवपद. ॥
सद्गुरुकृपा झाली । निज वस्तु देखिली ।
कल्पनेची मोडली समूळ वाट ।
हारपला देहभाव । संकल्पा कैंचा ठाव? ।
स्वरुपाचा अनुभव निजबोधें ॥ पाहाणें न० ॥ १ ॥
जें स्थूल ना सूक्ष्म नव्हे । जेथें सर्व सामावे ।
तें रूप जाणावें कैसेंनि आतां ।
परा पारुषली । प्रमाणें अप्रमाणें झालीं ।
दृष्टांतें वाहिली द्यावया आण ॥ पाहाणें न० ॥ २ ॥
सत् सदत्वीं गेलें । चिदीं चित्पण ठेलें ।
आनंद सामावला आनंदामाजी ।
ऐसिया निज दृष्टीं । सहजीं सहज होतसे वृष्टी ।
केशवीं होय आनंद कोंदेला[3] पाठिं पोटीं ॥ पाहाणें न० ॥ ३ ॥

### पद ७५५ वें.

माझा तात तो माय तो पाहीं स्वार्थ तो [4]संदेह नाहीं ।
नांदतों निःसंदेहीं आनंदें तृप्त ॥ ध्रुवपद. ॥
अंतरीं दाउनि हरी त्वंपद.......... ।
त्याचिया पायांची सैरी[5] न पवती कोण्ही ॥ माझा० ॥ १ ॥
संपूर्ण देउनी बोध । संपूर्ण नाशिला बंध ।
संपूर्ण सच्चिदानंदें तृप्त केलें ॥ माझा० ॥ २ ॥

---

१. शेषशायी. २. 'न इति' 'न इति'–हें नव्हे, असें उपनिषदांतील ब्रह्माचें वर्णन. ३. भरला. ४. संशय. ५. बरोबरी.

संपूर्ण सद्गुरु राजा । संपूर्ण तो स्वामि माझा ।
संपूर्ण अभेद पूजा । केशव करी ॥ माझा० ॥ ३ ॥

पद ७५६ वें.

तो जगद्गुरु लक्षितां मनीं । दुजा लक्षितां नाडले जनीं ॥ ध्रुवपद. ॥
भेद चोरुनी रूप दावितो । रूप चोरुनी प्रेम लावितो ।
प्रीति चोरुनी चित्त गोंवितो । चित्त गोवुनी सहज ठेवितो ॥ तो० ॥ १ ॥
बोध लावुनी प्रेम माजवी । प्रेम दावुनी बोध गाजवी ।
बोध देउनी रूप दाखवी । रूप देउनी सूख चाखवी ॥ तो० ॥ २ ॥
जीव मारुनी एकला असे । एकला असे त्यासि तो दिसे ।
तयां देखतां दूसरा नसे । सहज केशवीं सहज तो दिसे ॥ तो० ॥ ३ ॥

पद ७५७ वें.

आतां बाई! काय वो! करावें? । मन माझें वेधियलें माधवें ॥ ध्रुवपद. ॥
पाहूं गेलें नंदाच्या नंदना । तंव मूर्ति बैसली नयनां ।
तिचा छंद लागला या मना । कांहीं केल्या विसर पडेना ॥ आतां० ॥ १ ॥
सहज यासी पाहूं मी गेलियें । पाहातें पाहाणें गिळूनि ठेलियें ।
मागुतीं दृश्य घरा जों आलियें । सर्वदां तेंचि देखती जाहलियें ॥ आतां० ॥२
[1]अशनीं [2]शयनीं [3]गमनागमनीं । श्रीरंगें मज वेधिलें [4]साजणी! ।
सद्गुरुकृपें केशवीं ऐक्यपणीं । समाधी तेथें राहिलें द्वैतभाव निरसुनी ॥ आतां० ॥३॥

पद ७५८ वें.

........ ही हेचि परिमाण निजानंदाचें जाण ।
जाणुनि खूण हे त्यागणें । त्यासि नाहीं जाणणेपण ॥ ध्रुवपद. ॥
अनुत्पन्न संतान जे ठायीं । तये स्वरुपीं पाहीं ।
सर्वदां परिपूर्ण संचला । त्यासी मर्यादा नाहीं ॥ १ ॥
ब्रह्म [5]सनातन सकल सिद्ध । संचलें ऐसें जाणिजे कवण ।
आपलें जाणणें न घडे आपणां । सर्व विलक्षणा कांहीं न घडेचि होणें ॥ २ ॥
प्रतिती झाली ऐसें बोलती अति । डोलतीं ते तव नेणती कांहीं ।
केशवस्वामी सदोदित हा सत्ता । मात्र हा सहज कांहीं ना बाहीं ॥ ३ ॥

पद ७५९ वें.

एकी कीं बेकी पोरा! सांग झडकरी ।
बेकि निघाल्या पोरा डाव पडे हारी ॥ ध्रुवपद. ॥

---

१. भोजनाच्या वेळीं. २. निजते वेळेस. ३. जातांयेतां. ४. मैत्रिणी. ५. पुरातन.

पाराशराचें पोर येथें कष्टी झालें मोठें ।
गडी आमुचा नारद आला लाविलें तेणें वाटे ॥ एकी० ॥ १ ॥
केशवराज्यीं एकचि आहे नाहीं दुजें कांहीं ।
एकीं अनेक पाहें गुरुकृपा कांहीं ॥ एकी० ॥ २ ॥

पद ७६० वें.

करुणासागरा! रामा! येंई रे! । मज भेट देंई रे! ॥ ध्रुवपद. ॥
अहंकारें गांजिलें परोपरी । हे कायापुरी ।
संशयें घेतली पाठी भारी । त्यासी कवण वारी? ॥ रामा० ॥ १ ॥
पडली मायेची पायीं बेडी । तिसी कोण काढी? ।
तुझिया नामाची केली जोडी । भवबंधन तोडीं ॥ रामा० ॥ २ ॥
केशव दातारा राघववीरा । साराच्या सारा ।
आपुले चरणीं दे मज थारा । तूं दीनोद्धारा! ॥ रामा० ॥ ३ ॥

पद ७६१ वें.

बोधें भुलविला मदनारी । ऐशा मंगळ नारी ॥ ध्रुवपद. ॥
आम्हीं देखियल्या चिच्छक्ति । ज्यांच्या पायीं रुळती मुक्ती ॥ बोधें० ॥ १ ॥
जयासि सादर हे आलिंगी, । ते तंव झाले हो योगी ॥ बोधें० ॥ २ ॥
त्रिभुवनतारक शिव गंगा । केशव इच्छितसे संगा ॥ बोधें० ॥ ३ ॥

पद ७६२ वें.

तेथींचें सुख सांगतां साजणी! । मौन पडलें चौघांच्या वदनीं ॥ ध्रुवपद.॥
वंदुनि गुरुरायाचीं पाउलें, । समाधिशेजेवरि मी पहुडलें, ।
तेथें एक नवल म्यां देखिलें, । वाटे मजमाजी मी भेटलें ॥ तेथींचें० ॥१॥
पाहतां कांहीं न दिसे तंव डोळां । हारपली दीप्तीसी दीपकळा ।
कळा कळातीत सोहळा । सहजीं सहज होतसे अवलीळा ॥ तेथींचें० ॥२॥
मग मी हो! पाहतें आपणा । ह्याही जेथें नुरेचि स्फुरणा ।
सद्गुरुकृपें केशवीं परिपूर्ण । कवण तेथें भेटवूं कवणा? ॥ तेथींचें० ॥ ३ ॥

पद ७६३ वें.

काय तूज वानावें? आम्हीं । चिदात्मा! माहेरा! स्वामी! ।
सर्वदा मंगळधामीं । ठेविलें आम्हां ॥ ध्रुवपद. ॥
निजनामें आळविलें । स्वरूपीं सावध केलें ।

१. उत्तमांतील उत्तमा. २. आश्रय. ३. शंकर. ४ लोळती. ५. चारी वेदांच्या. ६. निजलें. ७. लीलेनें, सहज.

नाहीं नाहीं चाळविलें । दीधलें सुख ॥ काय० ॥ १ ॥
निजानंदीं बोळवण । पूर्ण झाली पैं ठेवण ।
दृश्यादृश्य आठवण । सर्वही गेली ॥ काय० ॥ २ ॥
हस्तक ठेविला माथां । स्वपदीं नांदतों आतां ।
तात तूं स्वानंददाता । केशव म्हणे मी आतां ॥ काय० ॥ ३ ॥

### पद ७६४ वें.

राम माझा अखंड घाली डोळा ॥ ध्रुवपद. ॥
कर्मेंविण सौरी झालें आलें महाद्वारा ।
हिंडेन सैरावैरा तो जिवींचा सोयरा ।
त्यासि पाहातां डोळां खुंटल्या येरझारा ॥ राम० ॥ १ ॥
जेथें जावें तेथें न दिसे कोठें जाऊं आतां ।
मनीं पाहातां परी ठाव न दिसे रिता[1] ।
भ्रांति सोंवळें फिटतां अवसर[2] नलगे एकांता ॥ राम० ॥ २ ॥
एकांताची सोलिंव गोडी सांगतां नये गोठीं ।
मीतूंपणा हिरोनियां मोहन पडली मिठी ।
सद्गुरुकृपें केशवराजीं अखंड होत भेटी ॥ राम० ॥ ३ ॥

### पद ७६५ वें.

सिद्ध जागता जगजोगी, आत्माराम निजयोगी[3] रे! ॥ ध्रुवपद. ॥
शांती सुनारीचा राजा राजा रे! । आत्मा प्राणसखा माझा रे! ।
भाव सांडुनियां दुजा दुजा रे! । सहज करूं त्याची पूजा रे! ॥ सिद्ध० ॥ १॥
प्रेम घागरीयाचा घोळ रे! । पायीं गर्जे सर्वकाळ काळ रे! ।
नामें तोडी मायाजाळ जाळ रे! । घनानंद क्षेत्रपाळ रे! ॥ सिद्ध० ॥ २ ॥
ज्ञान डौर्रे[4] साजे करीं करीं रे! । नैन पत्र शिरीं शिरीं रे ।
आत्मा पूर्ण चैराचरीं[5] रे! । शिंगी वाजे निरंतरीं रे! ॥ सिद्ध० ॥ ३ ॥
काम क्रोध दैत्य भारी रे! । बोध त्रिशूळेंचि मारी रे! ।
अंगीं विभूति निर्विकारी रे! । स्वामी अलक्ष वेषधारी रे! ॥ सिद्ध० ॥ ४ ॥
प्रकृति भाग श्रवण झांकी रे! । गाय स्वरूप तिहीं लोकीं रे! ।
नाचे उडे एकाएकीं रे! । किजे नमन ब्रह्मादिकीं रे! ॥ सिद्ध० ॥ ५ ॥

---

१. रिकामा. २. वेळ, उशीर. ३. 'राजयोगी' असा अन्य पाठ. ४. डमरू. ५. स्थावर-जंगमीं.

त्याला श्रवण मुद्रा योगी रे! । पुढें पाउल टाकी वेगीं रे! ।
दावी फिरूनी तीर्थें जगीं रे! । भगवें केलें दीनालागीं रे! ॥ सिद्ध० ॥ ६ ॥
देव सर्वी सर्वातीत रे! । गुणागुणीं विवर्जित रे! ।
आदिपुरुष सदोदित रे! । केले दास जीवन्मुक्त रे! ॥ सिद्ध० ॥ ७ ॥
दीननाथ दीनबंधु । महाराज दयासिंधु, ।
केशवस्वामी पूर्ण बोधू । त्याचे पायीं आम्हां बोधु बोधु रे! ॥ सिद्ध० ॥ ८ ॥

### पद ७६६ वें.

त्यासी अनन्य रिघतां शरण । मग पुढें कैचें जन्ममरण ॥ ध्रुवपद. ॥
सर्व सुखाचा दायक । गुरू नभातीत पदनायक ॥ त्यासी० ॥ १ ॥
जो निर्गुण स्वरूपें घडिला । निज भाग्यवंत जनीं जोडिला ॥ त्यासी० ॥ २ ॥
म्हणे केशव आमुचा स्वामी तो । नांदे सकळांच्या अंतर्यामीं तो ॥ त्यासी० ३

### पद ७६७ वें.

ते म्यां देखिली विठाई ऐशी ॥ ध्रुवपद. ॥
कटीं ठेवुनियां कर । उभी भिंवरेसमोर ।
ब्रह्मादिकां अगोचर । न कळे पार वेदांसी ॥ ते म्यां० ॥ १ ॥
तुम्ही धरा हो! मानसीं । अनंत भुवनें जिचे कुशीं ।
नामें जन्ममरण नाशी । पंढरपुरची विठाई ॥ ते म्यां० ॥ २ ॥
भाव देखोनियां दृढ । उद्धरिले जड मूढ ।
उगवी संसाराचें गूढ । ते धूर पंढरिची ॥ ते म्यां० ॥ ३ ॥
जिच्या चरणींच्या उदका । शिवें वाहिलें मस्तका ।
पार नकळे तिहीं लोकां । ते देखा पंढरिये ॥ ते म्यां० ॥ ४ ॥
जिची भेट घ्यावयालागीं । शिणले सिद्ध साधक योगी ।
ते उभी चंद्रभागीं, । युगायुगीं पंढरिये ॥ ते म्यां० ॥ ५ ॥

---

१. लवकर. २. गुरु—अंधकारनिरोधक. 'गुशब्दस्त्वंधकारश्च रुशब्दस्तु निरोधकः । अंधकारनिरोधत्वाद्गुरुशब्दो निगद्यते ॥' [सौरपुराण—अध्याय ६८ श्लो० १०.] ३. नभांत (आकाशांत—स्वर्गांत) असलेल्या पदाचा (मोक्षाचा) स्वामी. ४. हृदयांत, मनांत. ५. पृष्ठ ४ टीप १ पहा. ६. भीमानदीसमोर. ७. श्रेष्ठ. ८. गंगा. हिची उत्पत्ति विष्णूच्या पायांपासून आहे म्हणून हिला 'विष्णुपदी' असेंही म्हणतात. आणि विठ्ठलाच्या सुद्धां 'पादारविंदीं जनित' म्हणण्याचा उद्देश हाच आहे. ह्याविषयीं मोरोपंतानें एके ठिकाणीं म्हटलें आहेः—'गंगेचा तेंवि जयश्रीचा प्रभुच्या पदांबुजीं उगम' [अष्टम स्तोत्ररामायण—गीति ५७ उत्तरार्ध]. अशा प्रकारचे उल्लेख पंतांच्या आणि इतर सर्वमान्य मराठी कवींच्या ग्रंथांतून फार आढळतात. ९. स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ या तीन लोकांत. १०. पृष्ठ ८ टीप ८ पहा.

तुळसीमाळ अथवा बेल, घेउनि मुक्ती देतो शेलें[1]; ।
केशव म्हणे तिची गेल, । ध्यानें तुटे भवबंधन ॥ ते म्यां० ॥ ६ ॥

**पद ७६८ वें.**

हृदया निर्गुण मूर्ति आली वो! बाई! ॥ ध्रुवपद. ॥
नामरूपातीत आनंद पिकला, ।
सहजीं सहज भेट झाली वो! बाई! ॥ हृदया० ॥ १ ॥
पूर्वपुण्यफळें संसाराच्या बळें, ।
संकल्पाचा केला त्याग गे! बाई! ॥ हृदया० ॥ २ ॥
त्याग भोगीं देव सांपडला पूर्ण, ।
सफल झाला ज्ञानयोग गे! बाई! ॥ हृदया० ॥ ३ ॥
बाहेर अंतरीं सर्व निरंतरीं, ।
देवचि दाटला पाहीं गे बाई! ॥ हृदया० ॥ ४ ॥
केशव म्हणे आतां [2]मीपणालागीं, ।
निश्चयेंशीं ठाव नाहीं गे! बाई! ॥ हृदया० ॥ ५ ॥

**पद[3] ७६९ वें.**

दु[4]नियाका धंदा सारा छोड दिया भाई! ।
इ[5]ख्त्यार से न[6]जर बडे साहेब सों लाई! ॥ ध्रुवपद. ॥
चटकिनी बाला देखो लटकती आवे ।
बोधका प्याला लेकर र[7]हीम बे[8]शक होकर गावे ॥ दुनि० ॥ १ ॥
निजानंद मदसुं भुली बिसर गयी काया ।
देहसें बिदेह भया अब के[9]हां की माया? ॥ दुनि० ॥ २ ॥
मे[10]कर बिना ख्याल करे हाल मस्त माई ।
शंकर गंजे[11] आजि केशवराज प्रभूपायीं ॥ दुनि० ॥ ३ ॥

**पद ७७० वें.**

चटकी दा[12]नी और सु[13]जानी त्यावे मेहेरबानी ।
चीर ज[14]रीना पेह[15]ने सुख साहेबकु प[16]छानी ॥ ध्रुवपद. ॥

---

१. शेलकी, उत्तम. २. मीपणा=अहंकार, अहंभाव. ३. येथपासून पुढील सर्व पदांत फारच अपपाठ आहेत, पण निरुपायास्तव तीं तशींच छापलीं आहेत. ४. जगाचा. ५. सत्तेनें. ६. दृष्टी. ७. कृपाळू, दयाळू. ८. निःसंदेह. ९. देही होतें ती विदेही झालें. आतां माया कोठली? १०. कपटाशिवाय. ११. खजीना, सांठा. १२. दान करणारी. १३. शाहणी. १४. जुनें वस्त्र. १५. नेसून. १६. ओळखिलें.

नाचती दरबार चटकी सांडि सब काम ।
[1]बारबार बोले राम रहिम येही नाम ॥ चटकी० ॥ १ ॥
साहेब मेहेरे[2] धरे तब चटकी ख्याल करे ।
[3]मुसलम देह भाव बिसर [4]उस ख्याल में भरे ॥ चटकी० ॥ २ ॥
सद्गुरु पाया चटका ल्याया चटकी भई मस्त ।
कहत केशव उस म.................... ॥ चटकी० ॥ ३ ॥

### पद ७७१ वें.

काहांको पाप काहांको [5]पूंन । हम तो भये है सुनमो [6]सूंन ॥ ध्रुवपद. ॥
काहांको काया काहांको माया । भावत नहीं निर्गुनमों [7]गुंन ॥ काहां० ॥ १ ॥
आपही जगमों जगही आपमो । कोन लखे उन्मनमों [8]मन ॥ काहां० ॥ २ ॥
कहत केशव आपही आनंद । गगन मगनमों सबही [9]संगन् ॥ काहां० ॥ ३ ॥

### पद ७७२ वें.

बच्चा ! करले बिबेक । सबसें सबमों एक ॥ ध्रुवपद. ॥
अपने कल्पसे अपनी माया । [10]प्रपंच मृगजल देख ॥ बच्चा० ॥ १ ॥
देह वस्तीमें जीव शीव ये । नाना देव अनेक ॥ बच्चा० ॥ २ ॥
निर्गुणमो यह कछु नहीं भावे । कहत केशव [11]अलेख ॥ बच्चा० ॥३॥

### पद ७७३ वें.

बच्चा ! [12]बाहेर मत देख । तूंही तूं अलेख ॥ ध्रुवपद. ॥
सबका लायीं सबमों तूंही । मायामों ये भेकं[13] ॥ बच्चा० ॥ १ ॥
जीव शीव ये झूटमुट है । नाना देव अनेक ॥ बच्चा० ॥ २ ॥
कहत केशव सब [14]बहेकावे । [15]बहेजावे बिबेक ॥ बच्चा० ॥ ३ ॥

### पद ७७४ वें.

क्या करेगा मस्त । गुरु पगसें सब्र दस्त[16] ॥ ध्रुवपद. ॥
मन [17]थिरे पवनही हारे । गुन ये बिचारे [18]पस्त ॥ क्या० ॥ १ ॥

---

१. वारंवार. २. कृपा. ३. पूर्णपणें. ४. त्या. ५. पुण्य. ६. शून्यामध्यें शून्य. ७. निर्गुणामध्यें गुण असणें संभवत नाहीं. ८. उन्मनी अवस्थेंत मनाची भावना नष्ट होते. ९. शुभलग्न. आकाशवत् निराकार स्थिति प्राप्त झाल्यावर शुभच शुभ होतें. १०. 'इंद्रजालवत् प्रपंच सारा सुत वंध्येचा जैसा रे !' [त्र्यंबक—मागें पृष्ठ ६८ पहा.] ११. 'अलेख' 'अलख' या नांवानें फकीर ईश्वरास हाक मारितात. १२. देहाबाहेर जगत. १३. भेष, भेक, भेख असें रूपांतर झालें. १४. वाट विसरविती. १५. वाहून जाईल. १६. गुरुचरणाशिवाय सर्व खाली आहेत. १७. मन निश्चल राहत नाहीं व वारें जेथें शिरत नाहीं. १८. हार खातात.

चंचलसें[1] सब चंचल होवे । खोवे[2] अपनी वस्त ॥ क्या० ॥ २ ॥
कहत केशव निष्ठा जाकी[3] । तबही जगतसें[4] मस्त ॥ क्या० ॥ ३ ॥

**पद ७७५ वें.**

झूटा तेरा तप रे! ब्रह्म न झूटा तेरा जप ।
भात[5] रोटी गप, अतिथि सुर हें छप, तू क्या छूलवे[6] झडप ॥ध्रुवपद.॥
मुँसें[7] लेवे नाम अंदर भरो है काम ।
ऐसे बेफाम तुज कब मिलेगा राम? ॥ झूटा तेरा० ॥ १ ॥
तनको लगावे खाक[8] मनमें है नापाक[9] ।
ऐसे कैलांख[10] हम देखे हलाक[11] ॥ झूटा तेरा० ॥ २ ॥
बंदगी वक्त नहीं समजे बद वख्त[12] ।
अंदरकिया शख्त[13] अब क्यंव चढेगा वख्त[14] ॥ झूटा तेरा० ॥ ३ ॥
इतबार[15] नहीं दिल बहुत बंदगिमें ढील ।
ऐसा गाफिल हुवा साहेबसें बेदिल ॥ झूटा तेरा० ॥ ४ ॥
कहे केशवराज सुनो मेरा आवाज ।
सबको शिरताज[16] भजो गरीब नवाज[17] ॥ झूटा तेरा० ॥ ५ ॥

**पद ७७६ वें.**

इसे पकड बे इसे पकड बे । नंगावता[18] जिसें तिसें ॥ ध्रुवपद. ॥
गांठी छोडा घरको आया । कर काम गंज[19] पाया ॥ इसे० ॥ १ ॥
शुकको नंगा खुला किया । सुखमें[20] लढाय दिया ॥ इसे० ॥ २ ॥
अपने रंगो रंग जगावे । जगावेमें जग रंगावे ॥ इसे० ॥ ३ ॥
नारदको भी बाजी[21] दिया । मन में गंडी[22] छीन करलिया ॥ इसे० ॥ ४ ॥
केशव सांइ[23] घरको आया । घरका खाविंद[24] होके[25] रहा ॥ इसे० ॥ ५ ॥

१. चंचल वस्तूंपासून चंचलच वस्तू उत्पन्न होऊं शकतात; अचंचल वस्तु उत्पन्न होऊं शकत नाहींत. २. खोना=घालविणें, खर्च करणें. ३. ज्याची. ४. जगाविषयीं बेपर्वा. ५. जप, तप इत्यादि करणें हे भातरोटी खाण्यासारखें सुलभ नाहीं. अतिथि (साधुसंत वगैरे) व सुर (देव) हे अदृष्ट आहेत. ६. तूं काय त्याला शिवशील—त्यांची बरोबरी करशील? ७. तोंडानें. ८. राख. ९. अस्वच्छ. १०. कित्येक लक्ष. ११. मृत. १२. हतभागी, दुर्दैवी. १३. कठोर. १४. समय, वेळ. १५. भरंवसा. १६. मुख्य. १७. गरीबांचा कनवाळू. १८. नागवतो. [वाल्मीकिऋषीकडे कवीचा कटाक्ष असावा असें वाटतें.] १९. येथें 'गजेंद्रमोक्ष'कथेवर कवीचा कटाक्ष दिसतो. २०. शुकाला आजन्म ब्रह्मचारी ठेवून त्यास ब्रह्मानंदाचा लाभ दिला. २१. दगा. २२. नारदाच्या मनांत लग्न करून संसार करण्याची इच्छा झाली होती, ती श्रीकृष्णानें युक्तीनें नष्ट केली, अशी कथा आहे. [लघुकाव्यमाला-भाग १ आत्मारामकृत नारदीचरित्र-पृष्ठें ४८-५२ पहा.] २३. साधू. २४. स्वामी. २५. होऊन.

### पद ७७७ वें.

आव बे मुंडे नीमेर मुंडे मीले मुंडे भाई ! ।
मनका मैल धोकर मिले अस्सल मुंडा वोही ॥ ध्रुवपद. ॥

शीर[5] मुंडे सुंब गुंडे हातमें कुंतुक[6] ।
खाली देशांतर फिरते मरते घरकी घरमें चूक ॥ आव० ॥ १ ॥
मूर मुंडे समाल मुंडे अपना नफा देख ।
तेरा तुजकूं समज नहीं काहे को लेता भेक ॥ आव० ॥ २ ॥
या जिकीर विना फकीर कहता गद्दे ! तेरा काम ।
सब गुन्हा बकसीस किर्या बोल धनीका नाम ॥ आव० ॥ ३ ॥
खाली मुंडी चुप हलावे येतो मूने फेल ।
कतरिके पांव धर हातसें मैन मेल ॥ आव० ॥ ४ ॥
खबर धरो याद करो वैस्तादके पांव ।
केशव कहत मिलावे उस शिर भो इंधर जाव. ॥ आव० ॥ ५ ॥

### पद ७७८ वें.

राम सुमरन[11] करना रे ! बाबा ! ।
काम क्रोध मद मत्सर छांडो भवसागर तरना रे ! बाबा ! ॥ ध्रुवपद. ॥
खिनेखिन[12] आयुख[13] पावन[14] खसरत साधुसमागम धरना रे ! बाबा ! ॥ १ ॥
गमनागमन निवारन हरिगुन गावत वैकुंठ चढना रे ! बाबा ! ॥ २ ॥
ग्यान ध्यान अघमलहरन मनमो दयानिधि भरना रे ! बाबा ! ॥ ३ ॥
कहत केशव अब आवेंगा मरन बिसरूं नको हरिचरना रे ! बाबा ! ॥४॥

### पद ७७९ वें.

लालन सुं मेरी प्रीत[15] जरी । जागत सोबत रामकि
मूरत देखति हूं ज्याहां ताहा खडी[16] हो ! ॥ ध्रुवपद. ॥
साठ घडी मों श्यामकि बीसर । पैरंत[17] नहीं मुकुं एक घरी हो ! ।
प्रेम नीर नयन बरखन लागे । लोकनमों सब लाज उरी ॥ १ ॥

---

१. दुबळा, निर्बल. २. भेट. ३. पाप. ४. खरा, श्रेष्ठ. ५. मुंडन केलेले, साधु, संन्यासी. ६. कुबडी, काठी. ७. व्यर्थ, निरर्थक. ८. सर्व अपराध माफ केला. ९. हात व मन यांत मेळ असला पाहिजे, कृति व विचार यांत साम्य असलें पाहिजे; 'मनस्येकं वचस्येकं कृतिष्वेकम्' अशा रीतीनें वागलें पाहिजे. १०. गुरूचें. ११. स्मरण. १२. क्षणक्षण. १३. आयुष्य. १४. आयुष्य पायांखालून निसटत आहे. १५. प्रीति जडली. १६. उभी. १७. मला एक घटकाभर सुद्धां विसर पडत नाहीं.

कहा कहूं कछु कहत न आवे । शाम बदन नैन देख भुलीं हो ।
केशवके प्रभु गिरिधरनागर । चरन कमल वांके बिलग परी हो! ॥ २ ॥

**पद ७८० वें.**

अजि तो मै भूलि रह्योरी ॥ ध्रुवपद. ॥
अलेख बनमें एक ज्योगी जो आया उन्हे मुजे बोधकि भाग दियोरी ॥१॥
शिरपर दोन्हों हात उतारे कान फुंक मोकुं गुंग कियोरी ॥ २ ॥
सुख दु:ख भूक प्यास न जानूं उन्मनीं मन मगन भयोरी ॥ ३ ॥
भेद अभेद बात बचन जो वृत्ती शून्य तहां कौन कह्योरी ॥ ४ ॥
केशवके प्रभु पूरन कृपाकर आपन दोन्हों बिसर गयोरी ॥ ५ ॥

**पद ७८१ वें.**

ज्यांहां ज्याय तहां माधो है रे! ।
सब सूरतमें सूरत वांकी सब घट भरिया सोही रे! बाबा! ॥ ध्रुवपद.॥
धरनी आकाश सपत् पैताल आपहि भरपूर रहे रे! बाबा! ॥ १ ॥
खाली घर काहा कबहि न देखों देखूं सो सबही वोही रे! बाबा! ॥ २ ॥
कैसे करिये अब कहां ज्याइयें अंतर्बाह्य राजाराम भयो रे! ॥ बाबा! ॥३॥
केशव प्रभुबिन पैंदारथ नहीं रे सबही भेंख आप धरियो रे! बाबा!॥ ४ ॥

**पद ७८२ वें.**

रघुपति! दिनबंधु! तुम कृपानिधी! देवा! ।
जननमरनहरन! दिजे चरनकमलसेवा ॥ ध्रुवपद. ॥
अखिल निगम सार ज्योत सरुप निर्विकारी ।
जड जिव जन तारनकूं सगुन भेकधारी ॥ १ ॥
त्रिभुवनके नाथन मुनि जन के साईं ।
मंगल रूप ध्यान तेरा करंती हुं............ ॥ २ ॥
भगतबत्सल जानकिपति केशवप्रभु............ ।
कोटि चंदर सुरज बदन उपरि ............ ॥ ३ ॥

---

१. हें पद मिराबाईकृत असावें असें वाटतें. २. चिकटून. ३. तह्यान. ४. पूर्ण कृपा कर. ५. या सप्त पाताळांचीं नांवें:—अतळ, वितळ, सुतळ, रसातळ, महातळ, तळातळ आणि पाताळ. ६. रिकामें. ७. पदार्थ, वस्तू. ८. रूप. ९. रूपधारी. १०. हेंही मिराबाईकृत असावें किंवा निदान एखाद्या कवयित्रीनें केलेलें असावें. ११. सूर्य.

### पद ७८३ वें.

नौबत बाजत है हरनामकी ।
अति मंद भई गति सकलहि कामकी ॥ ध्रुवपद. ॥
मनमें बैटी मूरत श्यामकी ।
फिरत दुहाई राजा रामकी ॥ नौबत० ॥ १ ॥
ध्यान भले हम किये [१]अष्टजामकी ।
मंगल चाकरी केशव गुलामकी ॥ नौबत० ॥ २ ॥

### पद ७८४ वें.

ऐसी फकिरी नहींरे भाई येतो [२]सालिम [३]बेशरमाई ॥ ध्रुवपद. ॥
चेलेके घर हात पसारे । [४]दुनियांदारकुं मनात [५]प्यारे ॥ ऐसी० ॥ १ ॥
मैं हरि लडके मनमें धरना । बाहेर निमाज रोज करना ॥ ऐसी० ॥ २ ॥
कान खोलकर केशव बोले । गाफिल अलबत खावे [६]झोले ॥ ऐसी० ॥३॥

### पद ७८५ वें.

तालि बजाऊं गाऊं हरिका नाम । और देव सूं नहिं रे! काम ॥ ध्रुवपद. ॥
गलेमें तुलसी मन में राम । जित देखो तित रामहि राम ॥ तालि० ॥ १ ॥
अंदर राम बाहर राम । राम बिना [७]खाली नहिं रे [८]ठाम ॥ तालि० ॥ २ ॥
केशवप्रभु देखे पाये विश्राम । भगतबत्सल वोही रे! राजा राम ॥ तालि० ॥३॥

### पद ७८६ वें.

हार मुंडे हुषार मुंडे देख मुंडे भाई! ।
ढोंगी नजर देख बाबा! नजीक ईलाही ॥ ध्रुवपद. ॥
[९]धमक म्याने गमक मुंडे गमकमें [९]चमक ।
चमक म्याने ज्योति मुंडे ज्योतीमे झमक ॥ हार० ॥ १ ॥
चंद्र [१०]सूंरज मंद जहां [११]खीन [१२]भये तारे ।
सोलि आलख रूप बाबा! देख [१३]न्यारे न्यारे ॥ हार० ॥ २ ॥
तेजबिना ज्योति मुंडे ज्योति बिन प्रकाश ।
रंग बिना रूप मुंडे रूप बिना बास ॥ हार० ॥ ३ ॥

---

१. आठ याम (प्रहर). २. अगदीं पूर्णपणें, खरोखर. ३. निर्लज्जपणा. ४. संसारी मनुष्याला. ५. प्रिय. ६. हिसके, झोके, गटंगळ्या. ७. रिकामी. ८. जागा. ९. धमक—गमक—चमकज्योति—झमक=आकाशांत मेघगर्जना झाल्यानें जी वीज चमकते तिचा लखलखाट. १०. संस्कृतशब्दांत 'य'कार असल्यास हिंदीभार्षेत त्याच्या जागीं 'ज'कार होतो. जसें:—जशोदा (यशोदा), कारज (कार्य), जमुना (यमुना), इत्यादि. ११. क्षीण. १२. झाले. १३. निरनिराळे.

आगे भरपूर मुंडे पाछे भरपूर ।
पूरा गुरु पाइया तो हारबरत्थदीदार ॥ हार० ॥ ४ ॥
बहुत सौगंध[1] बाबा हम मुंडे हारे ।
कहत केशव गगन मगन सोही अल्लाके प्यारे ॥ हार० ॥ ५ ॥

### पद ७८७ वें.

फकीर ऐसे मलंग फकीर ऐसे मलंग ॥ ध्रुवपद. ॥
संतनके संग । खावे चिद्बोधकी भंग । सदा आनंदमों दंग ॥ फकीर० ॥१॥
बोधके मैदान खडे । शम दम सो आन[2] लढे । आलखका तख्त चढे ॥ २ ॥
लिया संतनका दुमाल । उसें तुटे भवजाल । कहत केशव कंगाल[3] ॥ फकीर०॥

### पद ७८८ वें.

कमलनयन निरख[4] नयन[5] बिसर गयी धंदा ।
देहसें बिदेह भयी देखति स्वानंदा ॥ ध्रुवपद. ॥
जमुनातीर भरन नीर श्यामसुंदर आयो ।
नाटकरूप देखत सखि! मन मेरा सुख पायो ॥ कमल० ॥ १ ॥
गोकुलमाह दिखत नहीं श्याम बिना कोयी ।
जीथतिथ नंदकुंवर[6] ज्याहां बिसर गयी दोयो ॥ कमल० ॥ २ ॥
तन मन हर श्यामजिनें प्रीतिमें सोलायी[7] ।
केशवप्रभु मिळत रोमरोम[8] सुख पायी ॥ कमल० ॥ ३ ॥

### पद ७८९ वें.

तोही सखि मैं संतन की चेरी[9] ।
बहोत क्या बोलों बात घनेरी[10] ॥ ध्रुवपद. ॥
बोध बाहादर घरको लावूं । काम क्रोधकौ जहर[11] पिलावूं ॥ १ ॥
त्रिभुवनमें आसन बाढूं । हृदयनिवासीका दरसन[12] पावूं ॥ २ ॥
चिंता वारूं ममता झाडूं । समता माईके पदरज[13] झाडूं ॥ ३ ॥
सहज समाधीकी सेज बिछावूं । केशव साईसुं हिल मिल जावूं ॥ ४ ॥

---

१. शेंकडों शपथा. २. येऊन. ३. गरीब, दीन. ४. पाहून. ५. डोळ्यांनीं. ६. नंदकुमार (कृष्ण). ७. निजविलें. ८. ज्याप्रमाणें आपल्या आंगावरील रोम (केश) मोजतां येत नाहींत त्याप्रमाणें अर्थात् अगणित, पुष्कळ. 'रोमरोम' या शब्दाचा उपयोग 'पुष्कळ' या शब्दाबद्दल हिंदीभाषेंत वारंवार करितात; जसें:—'मैं आपको रोमरोम धन्यवाद देता हूं.' ९. चेली. १०. पुष्कळ. ११. विष. १२. दर्शन. १३. पायधूळ.

### पद ७९० वें.

पालेगा तो पाल दयाल! तुम ॥ ध्रुवपद. ॥
तूंहि हमारा प्रान पियारा[1] । तुज बिगर नहिं ख्याल ॥ दयाल० ॥ १ ॥
दरसन लियाँ[2] मन मगन भयाजू । बिनस गया भवजाल ॥ दयाल० ॥ २ ॥
कहत केशवकबी तिहांरे[3] भजनसें । जबतब रहूंगा खुशाल ॥ दयाल० ॥ ३ ॥

### पद ७९१ वें.

यौं अपेबीर वासुदेव बोले । जो आनंदमदसुं झुले ।
ज्यो ख्यालमें मिलकर खेले । वो जिवते मुंजसुं मिले ॥ ध्रुवपद. ॥
जिनें धनीकी बंदगी[4] किया । जिनें भेदकूं गोषमाल[5] दिया ।
जिनें बोधका प्याला लिया । वो अपें बीर वासुदेव भया ॥ यौं० ॥ १ ॥
माबाप जोरु[6] बेटी लैरिके[7] । सब देखत लोग सरिखे ।
गुन गावत गुरु नरहरके । हम सेवक उस घरके ॥ यौं० ॥ २ ॥
ज्याकी ममता न्हाटक तराई । ज्याकी माया थी[8] सो मर गयी ।
जो अवकु समझा रही । दास केशवका साहेब[9] सोही ॥ यौं० ॥ ३ ॥

### पद ७९२ वें.

डर[10] चुकावे आब डर चुकावे ।
देवनका देव राजाराम दिखावे ॥ ध्रुवपद. ॥
संसार बैरी मेरा मार चलाया ।
गरीब नवाज[11] रघुराज मैं पाया ॥ डर० ॥ १ ॥
कामक्रोध भेद लोभ काफर मुवा[12] ।
कहत केशवराज बडा आनंद हुवा[13] ॥ डर० ॥ २ ॥

### पद ७९३ वें.

हुशार दिवाने[14]! मेरा नांव रखाया ।
महेबूब[15] मेरा मुजे मुजमें दिखाया ॥ ध्रुवपद. ॥
अपने नजीक मुझे[16] आजी बुलाया[17] ।
दिलका उपर[18] मेरा मार चलाया ॥ हुशार० ॥ १ ॥
बंदगी सुं मन मेरा दुरी छुटाया ।
अब बेद की तूं याद कर भेद फटकाया ॥ हुशार० ॥ २ ॥

---

१. प्यारा, प्रिय. २. दर्शन घेतलें. ३. तुझ्या. ४. नमस्कार, प्रमाण. ५. गोषांत (एकांतवासांत) कोंडून ठेविलें, भेदभाव नष्ट केला. ६. बायको. ७. मुलगे. ८. होती. ९. धनी, स्वामी. १०. भय. ११. गरीबांचा कनवाळू. १२. मेला. १३. झाला. १४. वेड्या. १५. पुष्कळ. १६. मला. १७. बोलाविलें. १८. येथें 'कुफर' असा अन्य पाठ आहे. कुफर=पाखांड.

बोधका सरबत मुजे बहुत पिलाया ।
कहत केशवराज ब्रह्मानंद झुलाया ॥ हुशार० ॥ ३ ॥

### पद ७९४ वें.

हरिगुण गावत नाचूंगी ॥ ध्रुवपद. ॥
प्रेममंदिरमें परमानंद सूं । श्यामकी कीरत बाचूंगी ॥ हरि० ॥ १ ॥
त्रिभुवननाथके संत उपासक । तनमन उनकूं बे[1]चूंगी ॥ हरि० ॥ २ ॥
केशव सांइके चरन मिलकर । अद्वय सुखसें बेचूंगी ॥ हरि० ॥ ३ ॥

### पद ७९५ वें.

राजाराम बेचत साधुके दुकान रे! ।
भरिया भंडार भरपूर नि[3]धान रे! ॥ ध्रुवपद. ॥
संसार नामका बंधिया जोख । उघडपसारा सौदा रोख ॥ राजा० ॥ १ ॥
प्रेम मोल लेवे श्याम जोख देवे । उधारके बाट संत कबहू न जावे ॥ राजा० ॥२॥
सब पोतेमां यहि भरिया सामान । केशव कहे तनु दियो लियो [4]भगवान् रे !॥राजा०॥

### पद ७९६ वें.

हम तो निजानंद नगरीके बासी ।
काहां करे गं[5]गा काहां करे कासी ॥ ध्रुवपद. ॥
भजन पुजन किया निजपदवासी । जानत नहीं कछु बात लिभासी ॥हम०॥१॥
कहत केशवकवी अंतर ध्यासी । नाम हमारा सहज संन्यासी ॥ हम० ॥ २ ॥

### पद ७९७ वें.

हरदम हरबखत मेरे राम कुंजमे । बाकी कुल बलादके ॥ ध्रुवपद. ॥
संतनके संग दंग प्रेमसों रह्या । फूकादर याच येहि बेदने कह्या ॥ हर०॥१॥
भजनसों किया निजबसका नफा । बोधमें किया सब संसारका सफा ॥हम०॥२॥
महाजूजमें शामी जीवता मु[6]वा । कहत केसोदास मेरा सिर[7]ताज हुवा ॥हम०॥३॥

---

१. विकीन. २. हें पद मिराबाईकृत असावें असें आम्हांस वाटतें, पण हें पद श्रीरंगनाथ-स्वामी निगडीकर यांच्या संग्रहीं असलेल्या केशवस्वामिकृत पदांच्या वहींत मिळाल्यामुळें आम्हींही त्याचा संग्रह ह्याच कवीच्या नांवाखालीं केला आहे. ३. सांठा, भांडार. ४. 'भगवान्' शब्दाची व्याख्या आढळते तीः—'उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामगतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥' म्हणजे,—सर्व स्थावरजंगमात्मक जगाचा उद्भव आणि नाश हे कसे होतात, जग आलें कोठून, जाणार कोठें, विद्या आणि अविद्या, काय आहेत, हें सर्व जो जाणतो त्याला भगवान् म्हणावें. किंवा सकल ऐश्वर्य, धर्म अथवा वीर्य, कीर्ति, द्रव्य, ज्ञान, वैराग्य हीं सहा भगें ज्यास आहेत तो भगवान्. ५. काशी व गंगा यांची यात्रा मीं कोठें केली आहे? अर्थात् 'नाहीं' हें अपेक्षित उत्तर. ६. मेला. ७. श्रेष्ठ, शिरोमणि, अग्रणी.

# अनेककविकृत पदें, कटाव, लावण्या वगैरे.

## भाग पहिला.

## परिशिष्टें.

### १. पदांची सूची.

१. हें पद बस्वलिंगकृत आहे. हें अपूर्ण आहे.

## कान्होबाकृत पदें.



## रामदासकृत पदें.

## केशवस्वामिकृत पदें.

१. हें पद नजरचुकीनें पुन्हा पृष्ठ २६० मध्यें आलें आहे.

१. हें पद सोहिरोबाकृत आहे.

## २. अधिक कडवीं.

पृष्ठ ४२ पद ८.१ हें एक दोन पोथ्यांत असें आढळतें:—

जोहार मायबाप जोहार । मी विवेकनाइक महार ।
तुम्हांसी सांगतों विचार । तो ऐका कीं जी! मायबाप! ॥ १ ॥
गांव तर पांचांचा । पंचवीस प्रजांचा ।
परंतु येथें सहाजणांचा । विचार कीजे मायबाप! ॥ २ ॥
ज्या धन्याचें शरीर । त्या धन्यासी नाहीं जोहार ।
अवघाचि कारभार । अवाजी करितात कीं जी! मायबाप! ॥ ३ ॥
अवाजीचि चाल फार । साराच वेढिला कारभार ।
या साजणांसि आधार । तिचाच कीं जी! मायबाप! ॥ ४ ॥
कामाजीबाजी हुद्देदार । क्रोधाजीबाजी सरदार ।
यांचे वेगळाले विचार । थोतांड रचितात कीं जी! मायबाप! ॥ ५ ॥
गांव तर होता चांगला । परि या साहीजणांनीं नाशिला ।
तुम्ही त्याशींच मिळालां । कीं काय? जी! मायबाप! ॥ ६ ॥
परि ते राहातील एकीकडे । अंतीं तुम्हांशींच गांठ पडे ।
मग तुम्हां इकडे तिकडे । जाऊं ने देती कीं जी! मायबाप! ॥ ७ ॥
आईजीनें यांसी कारभार दिधला । यांनीं सारिया गांवाचाचि नाश केला ।
परि हे शेवटीं तुम्हांला । खातील कीं जी! मायबाप! ॥ ८ ॥
मी तों लहान महाराचें पोर । परि हो! माझी धण्यासी प्रीत फार ।
धण्याचाही आधार । मज नफरावर कीं जी! मायबाप! ॥ ९ ॥
बाप! तुम्ही धन्यासी राजी राखा । नाहीं तरी शेवटिं होईल वाखा ।
तेथें कोणी नाहीं सखा । सोडवावया कीं जी! मायबाप! ॥ १० ॥
परि हें बरें नोहे, बरें नोहे । आतां तुम्हांसि होइल ठावें ।
धन्याचें हित फार करावें । लागे कीं जी! मायबाप! ॥ ११ ॥
तुमच्या हवाला केला गांव । तुम्ही विसरलां धन्याचें नांव ।
मतलब आल्यावर ठाव । कैंचा उरेल कीं जी! मायबाप! ॥ १२ ॥
तहशील लागेल कीं बाकीची । ते तुम्हां शुद्ध कैंची ।
म्हणून साहीजणांची । भीड धरूं नका कीं जी! मायबाप! ॥ १३ ॥
आईजीची आशा सोडा । हळू हळू बाकी झाडा ।
चौऱ्यायशींचा खोडा । पडूं नका जी! मायबाप! ॥ १४ ॥
मनाजी पाटील घ्यावा सवें । मज मागेंच तुम्हीं यावें ।
जेथें घरधणी आहे । तें घर ठावें आहे कीं जी! मायबाप! ॥ १५ ॥

श्रवणाची धरावी वाट । कीर्तनाचा चढावा घाट ।
पुढें विष्णु स्मर सपाट । मार्ग आहे कीं जी! मायबाप! ॥ १६ ॥
पुढें आहे विश्रांतिस्थान । सज्जनाचे पाद सेवन ।
अर्चनाचें अनंदवन । आहे कीं जी! मायबाप! ॥ १७ ॥
वंदा धन्याचें दरबार । दास्य करा निरंतर ।
सखे भक्त तेथें फार । आहेत कीं जी! मायबाप! ॥ १८ ॥
तेथें आत्माराम धनी । त्यासी जावें लोटांगणीं ।
सदा जवळ राहुनी । कार्य साधा कीं जी! मायबाप! ॥ १९ ॥
या मार्गें गेले थोर थोर । नारदादि ऋषीश्वर ।
धन्याचे दरबारीं निरंतर । राहिले कीं जी! मायबाप! ॥ २० ॥
एका जनार्दन महार । विवेकनामें वेसदार ।
अनंत घालोनि जोहार । हुशार करितो कीं जी! मायबाप! ॥ २१ ॥
एका जनार्दन कुळवाडि मोठा । ज्यानें बाकीस मारला फांटा ।
मोकळा केला दारवंटा । मोक्षपुरीचा कीं जी! मायबाप! ॥ २२ ॥

